मुख्य मंत्री / मंत्री / राज्यमंत्री
आस्थापनेवरील कर्मचा-यांच्या
विमान प्रवासास मंजूरी.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक प्रवास-1094/110/सेवा-5,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 26 सप्टेंबर 1994.

पहा:- (1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एमआयएन-1085/2388/(599)/1, दिनांक 7 जानेवारी 1986.

(2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक प्रवास-1689/48/89/सेवा-5, दिनांक 29 ऑगस्ट 1989,

(3) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक प्रवास-1693/159/सेवा-5, दिनांक 7 डिसेंबर 1993.

## शासन निर्णय

मुख्य मंत्री/मंत्री/राज्यमंत्री आस्थापनेवरील कर्मचारी विमान प्रवासविषयक तरतूदी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एमआयएन-1085/2388/(599)/1, दिनांक 7 जानेवारी 1986 अन्वये विहित करण्यात आलेल्या आहेत. त्या तरतूदीखाली जेव्हा मुख्य मंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांचे आस्थापनेवरील कर्मचा-यांचा खाजगी विमान कंपनीच्या सेवेनेप्रवास होतो, तेव्हा विमान प्रवासभाडे, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक प्रवास-1693/159/सेवा-5, दिनांक 7 डिसेंबर 1993 अन्वये, सार्वजनिक क्षेत्रातील विमान कंपनीच्या प्रवासभाड्याशी मर्यादित करुन देय ठरते. परंतु या कर्मचा-याचा खाजगी विमान कंपनीचा प्रवास, मंत्री महोदयांसोबतचा त्यांच्या आदेशानुसार होत असल्याने खाजगी विमान कंपनीने आकारलेले पूर्ण विमान प्रवास भाडे देय ठरविण्याची मागणी होत आहे. त्याबाबत काळजी पूर्वक विचार करुन शासन असे आदेश देत आहे की, मुख्य मंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांच्या आस्थापनेवरील कर्मचारी जेव्हा मंत्रिमहोदयांसमवेत खाजगी विमान कंपनीच्या विमानाने प्रवास करतील त्यावेळी त्या खाजगी विमान कंपनीने आकारलेले पूर्ण विमान प्रवासभाडे देय ठरविले जावे व अशा प्रकरणांना मुंबई नागरी सेवा नियमाखालील संबंधित तरतूदी शिथिल करुन शासनाने मंजूरी दिली असे समजण्यात यावे.

2. शासन असेही स्पष्ट करीत आहे की, मुख्य मंत्री/मंत्री/राज्यमंत्री आस्थापनेवरील कर्मचारी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एमआयएन-1085/2388/(599)/1, दिनांक 7 जानेवारी 1986 मधील तरतूदीखाली विमान प्रवास करतील तेव्हा तो एकॉनॉमी वर्गाने अनुज्ञेय राहील व वर उल्लेखित शासन निर्णयातील इतर तरतूदी तशाच लागू राहतील.

3. सदर आदेश निर्गमित झालेल्या दिनांकापासून लागू होतील. प्रलंबित असलेली प्रकरणे उपरोक्त

(कृ.मा.प.)

शामगु-रोटा- विवि एच-1082(3,000+10-10-94)

आदेशानुसार विनियमित करण्यात यावीत. तथापि, जी प्रकरणे आधीच निकालात काढली आहेत त्यांचा पुन्हा विचार करण्यात येऊ नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श्र.वि. लागवणकर,
उप सचिव, वित्त विभाग.

प्रति

(1) मुख्य मंत्री यांचे सचिव,
(2) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
(3) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
(4) महालेखाकार, महाराष्ट्र-1, मुंबई,
(5) महालेखाकार, महाराष्ट्र-2, नागपूर,
(6) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
(7) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
(8) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई (5 प्रती),
(9) वित्त विभागातील सर्व कार्यासने,
(10) निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-5.

---

एच-1082(3,000+10-10-94)-अ